राज्य आपत्ती कार्यकेंद्राचे (Emergency Operation Centre - EOC) नुतनीकरण करणेबाबत. (विद्युत कामे)

# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन (म व पु) विभाग,**
**शासन निर्णय क्र.मंनिक २०१६/प्र.क्र.८६/मंनिक-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई : ३२
दि. २ ऑगस्ट, २०१७

**प्रस्तावना :**

केंद्रिय गृहमंत्रालयाच्या अधिनस्त आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, नवी दिल्ली या "आपत्ती व्यवस्थापनातील" देशपातळीवरील शिर्षस्थ यंत्रणेने सर्व राज्यांच्या आपत्ती कार्यकेंद्रांना (Emergency Operation Centre - EOC) अद्ययावत करण्यासाठी अत्याधुनिक संपर्क यंत्रणा पुरविण्याचा निर्णय घेतला आहे. सदर संपर्क यंत्रणेसाठी पूरक व्यवस्था म्हणून महसूल व वन विभाग, मदत व पुनर्वसन उपविभागाच्या अधिनस्त राज्य आपत्ती व्यवस्थापन प्रभागाअंतर्गत **राज्य आपत्ती कार्यकेंद्राचे (Emergency Operation Centre - EOC)** नुतनीकरण व अद्यावतीकरण करण्याचे नियोजन आहे. **मंत्रालय नियंत्रण कक्ष** हे सदर कार्यकेंद्राचा भाग आहे. सदर नुतनीकरणाच्या कार्यवाहीनुसार राज्य आपत्ती कार्यकेंद्राचा सुधारीत आराखडा मुख्य वास्तुशास्त्रज्ञांच्या सहाय्याने तयार करण्यात आला आहे. या आराखड्याप्रमाणे राज्य आपत्ती कार्यकेंद्राच्या नुतनीकरणाच्या कामामध्ये स्थापत्य व विद्युत कामांचा समावेश होतो. त्यापैकी, विद्युत विषयक कामासाठी लागणा-या खर्चाच्या अंदाजपत्रकास मान्यता देण्याचे विचाराधीन होते. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :

१) आपत्ती व्यवस्थापन प्रभागाच्या अधिनस्त राज्य आपत्ती कार्यकेंद्राच्या (Emergency Operation Centre - EOC) नुतनीकरणाच्या कामापैकी **विद्युतविषयक कामांबाबत** कार्यकारी अभियंता, दक्षिण मुंबई विद्युत विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई यांनी सादर केलेल्या रु.१५,५७,७३४/- (रु.पंधरा लाख सत्तावन्न हजार सातशे चौतीस फक्त) च्या अंदाजपत्रकास याद्वारे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२) या कामी होणारा खर्च १३ व्या वित्त आयोगांतर्गत प्राप्त झालेल्या आणि राज्य आपत्ती सौम्यीकरण निधीत वर्ग केलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

३) उपरोक्त मान्यतेनुसार कार्यकारी अभियंता, दक्षिण मुंबई विद्युत विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई यांनी नुतनीकरणाच्या कामास त्वरीत प्रारंभ करुन ते त्वरेने पूर्ण करावे.

४) प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१७०८०२१७१०२०६८१९ असा आहे. हे शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसान व नावाने.

Shrirang Shripati Gholap

Digitally signed by Shrirang Shripati Gholap
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DMU/R AND R, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e1b6e289fe7dcde27c972916398d8220a134ed8ebf6439e54d1927c5c4b28bec, cn=Shrirang Shripati Gholap
Date: 2017.08.03 13:10:39 +05'30'

**(श्रीरंग घोलप)**
**अवर सचिव**

**प्रति,**

१) अ.मु.स. (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
३) संचालक, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) कार्यकारी अभियंता, दक्षिण मुंबई विद्युत विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई
५) अवर सचिव (आव्यप्र-१), मदत व पुनर्वसन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
६) लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई
७) आव्यप्र-१, संग्रहार्थ